**प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत सन २०२१-२२ मध्ये प्रशासकीय मान्यता दिलेल्या नाशिक जिल्ह्यातील कामांची प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२२/०३/प्र.क्र.२०६/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १० मे, २०२२.

संदर्भ : १)शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२१/१२/प्र.क्र.८४२/पर्यटन, दिनांक : ३१ जानेवारी, २०२२
२) शासन निर्णय क्रमांक टिडिएस २०२२/०३/प्र.क्र.२०६/पर्यटन, दिनांक : २९ मार्च, २०२२
३) जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक यांचे पत्र क्र.जिनिस/क-१२/संस-२/प्रादे-पर्य/२१-२२/८२३, दिनांक ०८.०४.२०२२.

**शासन निर्णय :**

प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२१-२२ अंतर्गत संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्यात आला आहे:-

(रुपये लक्षात)

| अ.क्र. | कामे | प्रशासकीय मान्यता | वितरीत निधी | कार्यान्वयीन यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| | **नाशिक जिल्हयातील विकास कामे** | | | |
| १ | हनुमान मंदिर देवस्थान चिंचोडी खु., ता. येवला येथे सुशोभिकरण करणे | १०.०० | ३५.०० | कार्यकारी अभियंता बांधकाम (इ व द) विभाग क्र. ३ जि. प. नाशिक |
| २ | सुळेवाडी, ता. सिन्नर येथे घाट व परिसर सुधारणा करणे | ३०.०० | | |
| ३ | खंबाळे, ता. सिन्नर येथे मारुती मंदिर परिसरात बांधकाम व अनुषंगिक कामे करणे | १०.०० | | |
| ४ | खंबाळे, ता. सिन्नर येथे खंडोबा मंदिर परिसरात शौचालय बांधकाम करणे | १०.०० | | |
| ५ | खंबाळे, ता. सिन्नर येथील नदी परिसरात सुशोभिकरण करणे | १०.०० | | |
| ६ | खंबाळे, ता. सिन्नर येथे खंडोबा मंदिर भोजनालय व अनुषंगिक कामे करणे | १०.०० | | |
| ७ | मऱ्हळ बु. येथे दत्त मंदिर परिसरात सभामंडप बांधणे | १०.०० | | |
| | **एकूण** | **९०.००** | **३५.००** | |

२. उपरोक्त तक्त्यामध्ये नमूद असलेल्या अनुक्रमांक २ ते ७ येथील कामांना यापूर्वीच संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ३१.०१.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असल्यामुळे सदर कामांची संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २९.०३.२०२२ च्या शासन निर्णयामध्ये पुनरावृत्ती झाली आहे. जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक यांनी संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये केलेल्या विनंती नुसार संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय, दिनांक २९.०३.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या उपरोक्त तक्त्यामधील अनुक्रमांक २ ते ७ येथील कामांची प्रशासकीय मान्यता याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

३. उपरोक्त तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कामांसाठी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय, दिनांक २९.०३.२०२२ अन्वये वितरीत करण्यात आलेल्या रु.३५.०० लक्ष निधीपैकी रु.१०.०० लक्ष निधी उपरोक्त तक्त्यामधील अनुक्रमांक १ येथील "हनुमान मंदिर देवस्थान चिंचोडी खु., ता. येवला येथे सुशोभिकरण करणे" या कामासाठी वापरण्यात यावा व उर्वरित रु.२५.०० लक्ष निधी शासन खाती तात्काळ जमा करण्यात यावा,

४. उपरोक्त कामाच्या अनुषंगाने अटी व शर्ती संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयाप्रमाणेच लागू राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५११०१७०७२२७३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ujjwala Santosh Dandekar

Digitally signed by Ujjwala Santosh Dandekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c63ad337cb443baf4ff2dd616156bccf1f2629f47cc970 4e8e8523f35b0e6505, cn=Ujjwala Santosh Dandekar
Date: 2022.05.11 14:50:59 +05'30'

**( उज्ज्वला सं. दांडेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई / नागपूर.
३. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, नाशिक.
५. जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती/ पर्यटन.

***